**अनुसूचित जातीच्या लाभार्थ्याकरीता विशेष घटक योजनेंतर्गत " मुख्यमंत्री सौर कृषि पंप योजनेंतर्गत " अनुदान देण्याकरिता नवीन लेखाशिर्ष उघडणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१९/प्र.क्र.२६/ऊर्जा-७**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : -०६.०२.२०१९

**वाचा :-** १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. सौरप्र-२०१८/प्र.क्र.४०१/ऊर्जा-७, दि. १५.११.२०१८.
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. सौरप्र-२०१८/प्र.क्र.४०१८/ऊर्जा-७, दि. ०१.०१.२०१९.
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. सौरप्र-२०१८/प्र.क्र.४०१/ऊर्जा-७, दि.३१.०१.२०१९

**प्रस्तावना :**

राज्यात “मुख्यमंत्री सौर कृषी पंप योजना” राबविण्याबाबत शासन निर्णय दिनांक १५.११.२०१८ अन्वये निर्णय घेण्यात आला असून राज्यात एक लक्ष सौर कृषी पंप आस्थापित करण्यासाठी विभागाच्या अर्थसंकल्पीय तरतूद व अनुसूचित जाती/जमाती लाभार्थ्यांना विशेष घटक योजना/ आदिवासी उपयोजनांतर्गत निधीचा वापर करून नवीन सौर कृषी पंप योजना तयार करण्यास मान्यता देण्यात आली आहे. राज्य मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार सामाजिक न्याय विभाग व आदिवासी विकास विभाग यांनी अनुसुचित जाती/जमातीच्या लाभार्थ्याकरीता लागणारा निधी हा विशेष घटक योजना व आदिवासी उपयोजना नियतव्ययाच्या रकमेतून अनुसुचित जाती/जमातींच्या लाभार्थ्यांकरीता राज्य हिस्सा व लाभार्थी हिस्सा वगळून उर्वरीत निधी (यात लाभार्थ्यांच्या ५ टक्के हिस्सा व्यतिरिक्त ५ टक्के अतिरिक्त हिस्सा व पंपाची उर्वरीत रक्कम यांचा समावेश आहे) उपलब्ध करुन द्यावयाचा आहे. सदरची योजना ही वैयक्तिक लाभार्थ्यासाठी असल्याने, या योजनेंतर्गत अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना विशेष घटक योजनेंतर्गत " मुख्यमंत्री सौर कृषि पंप योजनेंतर्गत " महावितरण कंपनीस अनुदान देण्याच्या प्रयोजनासाठी, मागणी क्र. के-०६, मुख्य लेखाशिर्ष २८१० “नवीन व नवीकरणीय उर्जा" अंतर्गत नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना विशेष घटक योजनेंतर्गत "मुख्यमंत्री सौर कृषि पंप योजनेंतर्गत" महावितरण कंपनीस अनुदान देण्याच्या प्रयोजनासाठी खालील प्रमाणे नवीन लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| खर्चाचे लेखाशिर्ष | | |
|---|---|---|
| **अ.क्र.** | **इंग्रजीत** | **मराठीत** |
| १. | Demand No. K-06<br>Major Head-2810 New and Renewable Energy<br>(00)<br>Minor Head-789 Scheduled Caste Component Scheme<br>Group Head –(00)<br>Sub Group Head - (00)(01) Chief Minister Solar Agriculture Pumps Scheme (SCSP)<br>( 28100983) Scheme<br>Object-31 - Grant-in-aid (Non-Salary) | मागणी क्र. के-०६<br>मुख्य लेखाशिर्ष- २८१०, नवीन व नवीकरणीय उर्जा<br>००<br>गौण शिर्ष - ७८९ अनुसूचित जाती घटक योजना<br>गट शिर्ष - (००) (०१) मुख्यमंत्री सौर कृषि पंप योजना (अनुसूचीत जाती उपयोजनेंतर्गत योजना)<br>( २८१००९८३) कार्यक्रम<br>उदिष्ट- ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) |

२. हा शासन निर्णय, महालेखापाल कार्यालयाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ख.वि/चा-१/उद्योग, ऊर्जा तथा कामगार विभाग/यूओआर-१७४/२०१८-१९/१०७९, दि. २८/०१/२०१९, सामाजिक न्याय व विशेष कल्याण विभागाचा अनौ. सं. क्र. २३/विघयो, दि. २३/०१/२०१९, व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. २८/२०१९/व्यय-१४, दि. २४/०१/२०१९ अन्वये मिळाललेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२०६१६४२१९०६१० असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशावरुन व नावाने,

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2019.02.06 16:44:04 +05'30'

**(ना रा. ढाणे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद/ विधानसभा.
४) मा. मंत्री, ऊर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
५) मा. मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६) मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

७) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
८) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर
१०) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर
११) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१३) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग , मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१४) प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१५) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या., प्रकाशगड, वांद्रे (पू), मुंबई - ४०० ०५१.
१६) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, स.न.१९१, म्हाडा विणिज्य संकुल, दुसरा मजला, त्रिदलनगर समोर, येरवडा, पुणे ४११००६
१७) वित्त विभाग, (व्यय-१६/अर्थ-७), मंत्रालय, मुंबई
१८) उपसंचालक, लेखा व सांख्यिकी संचालनालय, ४ था मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई ३२
१९) नियोजन विभाग, (कार्यासन १४१३/१४६१)
२०) अवर सचिव (रोख शाखा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
२१) अवर सचिव (ऊर्जा - ३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
२२) कक्ष अधिकारी (प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
२३) निवडनस्ती-ऊर्जा-७